**श्री.श्री.चु.श्रीरंगम,सहसंचालक (लेखा व कोषागारे)यांची महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाच्या सचिव पदावर प्रतिनियुक्तीने नेमणूक करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

**शासन निर्णय क्रमांक : इबांका-२०१६/प्र.क्र.३९७/काम-७**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ४ मार्च, २०१७.

## आदेश

श्री.श्री.चु.श्रीरंगम,सहसंचालक (लेखा व कोषागारे)यांच्या सेवा महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळातील सचिव तथा मुख्य कार्यकारी अधिकारी या पदावर प्रतिनियुक्तीने एक वर्षाच्या कालावधीसाठी खालील अटींच्या अधीन राहून सुपूर्द करण्यात येत आहेत.

(अ) श्री.श्री.चु.श्रीरंगम ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल.त्यानंतर एक वर्षानी प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सुपूर्द करुन त्यांच्या मूळ विभागात ज्या तारखेला रुजू होतील त्या तारखेला त्यांच्या प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

(आ) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम अधिकारी राखून ठेवील.

(इ) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही, तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्याची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ई) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे, अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. म.ना.से.(पदग्रहण अवधी,स्वीयेत्तर सेवा) नियम,१९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट-२) मधील तरतुदी विचारात घेऊन महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाने वित्त विभागाशी सल्लामसलत करुन श्री.श्री.चु.श्रीरंगम यांच्या प्रतिनियुक्ती बाबतच्या अटी व शर्ती ठरवाव्यात.

३. श्री.श्री.चु.श्रीरंगम यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी वित्त विभाग व या विभागामार्फत हाताळण्यात येतील. त्यानुसार सचिव महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी वित्त विभागाने श्री.श्री.चु.श्रीरंगम यांना कार्यमुक्त करण्याची कार्यवाही करावी.

४. श्री.श्री.चु.श्रीरंगम यांनी प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होऊन तसा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून,त्याचा संगणक संकेतांक २०१७०३०४१५५८५७६०१० असा आहे. तसेच सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pursing Rathod

Digitally signed by Prashant Pursing Rathod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=I.E. And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=52765f3be2e2200a1f6f448ce52356167e452ddd0e9b494a8409e6be0d39bd0d, cn=Prashant Pursing Rathod
Date: 2017.03.04 16:03:54 +05'30'

**( प्रशांत पु.राठोड )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
३. मा. अध्यक्ष, इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई यांचे स्वीय सहायक.
४. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक.
५. प्रधान सचिव (वित्त ) यांचे स्वीय सहाय्यक
६. उपसचिव( कामगार) यांचे स्वीय सहाय्यक.
७. समितीचे इतर सर्व सदस्य (व्दारा कामगार आयुक्त)
८. कामगार आयुक्त, मुंबई / अतिरिक्त कामगार आयुक्त, मुंबई/पुणे/नागपूर.
९. उप कामगार आयुक्त, मुंबई, ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद.
१०.सचिव, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई
११.महालेखापाल-१ महाराष्ट्र (लेखापरिक्षा व लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
१२.महालेखापाल-२ महाराष्ट्र (लेखापरिक्षा व लेखा अनुज्ञेयता), नागपूर.
१३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४.निवडनस्ती (कामगार-७).